सह सचिव पदावर पदोन्नतीच्या पदस्थापनेमध्ये बदल करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः नासेमं-१२२४/प्र.क्र.७९/प्रशा-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०१ जुलै, २०२४.

**संदर्भ** .शासन आदेश क्र :ससप-११२३/प्र.क्र.१०१/प्रशा-१ (का.१४), दि.१६.०५.२०२४.

**आदेश**

श्री. श्यामलाल र. चौरे यांना संदर्भीय आदेशान्वये, उप सचिव पदावरून सह सचिव पदावर पदोन्नती देण्यात येऊन पदोन्नतीनंतर त्यांची पदस्थापना सामान्य प्रशासन विभागात करण्यात आली होती.

२. आता या आदेशान्वये श्री. श्यामलाल र. चौरे यांना सह सचिव पदावरील पदोन्नतीनंतर सामान्य प्रशासन विभागात देण्यात आलेली पदस्थापना प्रशासकीय कारणास्तव रद्द करण्यात येत असून, श्री.चौरे यांना राज्य माहिती आयोग, बृहन्मुंबई खंडपीठ, मुंबई या कार्यालयात सह सचिव पदावर प्रपत्र बढती देण्यात येत आहे.

३. श्री. श्यामलाल र. चौरे यांना, महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियम ४०, परिशिष्ट-२, अट क्र.१८ नुसार, तात्पुरत्या स्वरूपात प्रपत्र बढती (पदोन्नती) देण्यात येत आहे. सदर तरतुदीनुसार प्रपत्र बढतीचा कालावधी हा आदेशाच्या दिनांकापासून ६ महिन्यांचा राहील. त्यानंतर श्री.चौरे यांनी मंत्रालयीन विभागात हजर होणे आवश्यक राहील.

४. श्री.चौरे यांच्या पदोन्नतीच्या अटी व शर्ती संदर्भाधीन आदेशात नमूद केल्याप्रमाणे कायम राहतील.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०७०११६५५१९६७०७ हा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASHANT SHRIDHAR SHELAR

Digitally signed by PRASHANT SHRIDHAR SHELAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=8808a7686c8d5106a1fe553bcee5455c94da9b2df26765e2297b06d021a026aa, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CA04078FB06F0081DFBD03E54745E990386674B41F0FCFE82C712FD283E6D114, cn=PRASHANT SHRIDHAR SHELAR
Date: 2024.07.01 17:06:12 +05'30'

**( प्र. श्री. शेलार )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
२. मा.मुख्यमंत्र्यांचे अ.मु.स./प्र.स.
३. अ.मु.स. (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. राज्य माहिती आयोग, बृहन्मुंबई खंडपीठ, मुंबई.
५. सह सचिव (आस्थापना), सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय, मुंबई.
६. संबंधित अधिकारी (कार्यालयामार्फत).
७. निवडनस्ती प्रशा-१.